पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, बारामती या संस्थेकरीता सुरक्षारक्षकांची पदे पुणे जिल्हा सुरक्षा रक्षक मंडळामार्फत भरणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग
## शासन निर्णय क्रमांकः वैशिवि-२०२३/प्र.क्र.२००/प्रशासन-२

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, लोकमान्य टिळक मार्ग
नविन मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख: ०२ ऑगस्ट २०२३.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्रमांकः एसजीए-१५०६/प्र.क्र.९२/काम-५, दिनांक ०८.११.२००६.
२) शासन अधिसूचना, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांकः एसजीए-२०१४/प्र.क्र.३००(२)/कामगार-५, दिनांक ३०.०७.२०१४.
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम/भाग-२, दि. १७.०४.२०१५.
४) शासन निर्णय वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांकः एमईडी-२०१०/प्र.क्र.१८७/२०१२/शिक्षण-१, दिनांक ०३.०१.२०१३.
५) शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांक: एमईडी-२०१३/प्र.क्र.२१२/१३/शिक्षण-१, दिनांक ०५.०७.२०१९.
६) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:- पदनि-२०२२/प्र.क्र.१५/आ.पु.क., दिनांक २७.०४.२०२२.
७) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय यांचे पत्र क्र.संवैशिवसं/शावैमबा/बाह्यस्त्रोत/सुरक्षा रक्षक/२०१३/२०२३, दिनांक १७.०७.२०२३.

**प्रस्तावना :-**

विभागाच्या संदर्भ क्र. ४ वरील बारामती येथील १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे वैद्यकीय महाविद्यालय व ५०० रुग्णखाटांचे रुग्णालय सुरु करण्यास दिनांक ०३.०१.२०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच, दिनांक ०५.०७.२०१९ रोजीच्या शासन आदेशान्वये शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, बारामती येथे प्रथम वर्षाकरीता १०० विद्यार्थी प्रवेशास परवानगी देण्यात आली आहे. शासकीय वैद्यकीय महाविद्यालय परिसरामध्ये विद्यार्थी, प्राध्यापक व अन्य शासकीय कर्मचा-यांच्या सुरक्षिततेसाठी बाह्यस्त्रोताद्वारे सुरक्षा रक्षक उपलब्ध करुन घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, बारामती या संस्थेमध्ये प्रवेशित विद्यार्थी, विद्यार्थीनी तसेच संस्थेमधील प्राध्यापक/सह प्राध्यापक व अन्य शासकीय कर्मचा-यांच्या सुरक्षेच्यादृष्टीने ८० सुरक्षा रक्षक (विविध अधिकारी/कर्मचारी) पुणे जिल्हा सुरक्षा रक्षक मंडळ या संस्थेकडून उपलब्ध करुन घेण्यास व त्याकरीता येणा-या रु. २,६५,४३,६४०/- (अक्षरी रुपये दोन कोटी पासष्ट लक्ष त्रेचाळीस हजार सहाशे चाळीस केवळ) एवढ्या वार्षिक खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५, वित्तीय अधिकार नियम भाग पहिला, उप विभाग -४, अ.क्र. ११ अन्वये प्रशासनिक विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर बाबींसाठी येणारा खर्च पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, बारामती या संस्थेच्या खालील लेखाशिर्षाखाली (१०) कंत्राटी सेवा या उद्दिष्टांतर्गत चालू वित्तीय वर्षात अर्थसंकल्पीत निधीमधून भागविण्यात यावा.

मागणी क्र. एस-०१
२२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
(१०५)- विषमचिकित्सा
(०४)(३५)- शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, बारामती (कार्यक्रम)
सांकेतांक क्र. २२१० ई ९०२
(१०)- कंत्राटी सेवा

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८०२१७४००४५९१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO JOGDAND

Digitally signed by MAHADEO JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, pseudonym=85719993A847361CF1CE96786397786A408A4972, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO JOGDAND
Date: 2023.08.02 06:08:03 -07'00'

**(म. गि. जोगदंड)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)१/२, महाराष्ट्र, मुंबई.
३. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
४. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
७. अधिष्ठाता / अधिक्षक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, बारामती.
८. निवडनस्ती (प्रशा-२)